**सहकार विभागाच्या अंतर्गत मौजे. येरवाडा स.नं.१९१ अ.पै.पुणे येथे सहकार संकुल इमारतीचे बांधकाम करण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बांधका-२०२२/प्र.क्र.८२/२२-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ मार्च, २०२२.

<u>वाचा</u> : सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांक (१) सआ-१५/संवका/सहकार संकुल/१७२५/२०२१, दिनांक २६.११.२०२१.
(२) संवका/१५-सआ/सहकार संकुल/१८६९/२०२२, दिनांक ०३.०२.२०२२.

**<u>प्रस्तावना :</u>**

सहकार विभागाच्या अधिपत्याखालील पुणे शहरातील २३ कार्यालये खाजगी जागेत भाडेपट्टीवर कार्यरत असून त्यांच्या वार्षिक भाडयापोटी बराच शासकीय निधी खर्ची पडतो. सदरचा नाहक होणारा खर्च कमी करणेकरीता तसेच, सहकार विभागाची पुणे शहरातील सर्व क्षेत्रीय कार्यालये एकाच छत्राखाली (One Roof) पुणे येथे स्थापित करण्यासाठी मौजे येरवडा, स.नं.१९१ अ.पै.पुणे या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या जागेवर "सहकार संकुल" इमारतीचे बांधकाम करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त प्रस्तावासोबतच्या अंदाजे रु.१०८.०९ कोटीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. सदरहू अंदाजपत्रकास मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :

सहकार विभागाच्या अधिपत्याखालील सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या अधिपत्याखाली मौजे येरवडा,सं.नं.१९१ अ.पै. पुणे येथील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या जागेवर "सहकार संकुल", इमारतीचे बांधकाम करण्यासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४.०२.२०२२ रोजी पार पडलेल्या उच्चाधिकार सचिव समितीने अंदाजित एकूण रुपये ९४.५९ कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून सहमती दर्शविली आहे. त्यानुसार खालील अटींच्या अधिन राहून एकूण अंदाजित रुपये ९४.५९ कोटी ( रुपये चौऱ्याण्णोव कोटी एकोणसाठ लक्ष फक्त ) इतक्या किंमतीच्या खालील कामाच्या अंदाजपत्रकास या आदेशाद्वारे प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | सहकार विभागाअंतर्गत मौजे येरवडा स.नं.१९१ अ.पै.पुणे येथे “सहकार संकुल” उभारण्यासाठी Basement १ & २ + G +१० Floor इमारतीचे बांधकाम करणे . | ९४,५९,००,०००/- |

अटी :

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक तयार करुन त्यासंबंधीत सक्षम प्राधिकारी/अभियंता यांची मान्यता घेवूनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दिनांक ०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाचा निविदा सूचना अग्रगण्य वर्तमानपत्रात प्रसिध्द करण्यात याव्यात.

६) अर्थसंकल्पात तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करु नये.

**७) प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीचे जोते क्षेत्रफळ कर्मचारी वर्ग यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करावी.**

८) संबंधीत नियंत्रक अधिकारी यांनी वास्तुमान्य आराखडा व कार्यकारी आराखडे, मुख्य वास्तू वास्तुशास्त्रज्ञाकडून तयार करुन घ्यावीत, तसेच आवश्यक त्या प्रमाणपत्रांना महानगरपालिका, तत्सम प्राधिकरणे इत्यादी यांची - **मंजुरी** आणि **ना-हरकत** प्रमाणपत्रे बांधकाम सुरु करण्यापुर्वी प्राप्त करण्यात यावीत.

९) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच, इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

१०) इमारतीमध्ये दिव्यांग व्यक्ती तसेच जेष्ठ नागरिकांचा विचार करुन उपलब्ध करुन दयावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

११) विषयांकित कामाकरीता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदर बांधकामासाठी येणार खर्च मागणी क्रमांक एच-८, “४०५९ - सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च” या प्रधानशिर्षाअंतर्गत भागविण्यात यावा. याबाबतचे सविस्तर लेखाशिर्ष व संगणक सांकेतांक स्वतंत्ररित्या आदेशान्वये निर्गमित करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाने अनौसं.क्र.२१/२०२२/इमा-२, दिनांक २८.०२.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक २४.०२.२०२२ रोजीच्या बैठकीत दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकारांच्या वित्तीय मर्यादा व अटींमध्ये करण्यात आलेल्या सुधारणेस अनुसरुन वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३०४१८३४१०५७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2022.03.04 18:36:08 +05'30'

**( अं.पां.शिंगाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
५) मा.प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे स्वीय सहाय्यक
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, मध्यवर्ती इमारत, पुणे
७) मा.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
८) मा.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,पुणे मध्यवर्ती इमारत परिसर, कॅम्प, पुणे-४११००१. (सोबत Recapitulation Sheet जोडली आहे )
९) मा.महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई
१०) मा.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
११) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन व लेखापरिक्षण)
१२) सर्व उप सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) कार्यासन अधिकारी (इमारत १/ २), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (२२-स)